ला. बाबिंग्तन क्याथोलिक धर्माचा पक्षाचा आहे, आणि मेरीचा त्यास अभिमान आहे, ही गोष्ट सर्वत्र प्रसिद्ध होती; ह्मणून त्यांणें तो बेत मान्य केला; आणि त्या भयंकर उद्योगास कितिएक दुसरे लोक सहाय करून घेतले. हा सर्व उद्योग मेरीचे स्वार्थाकरितां होत होता, याकरितां प्रथम त्याणीं तें वर्तमान मेरीला कळवावें, असा बेत केला; त्या मेरीचे खोलींत भिंतीला एक भोंक होतें त्यांतून तिला दारू जो देत असे, त्याचे हातून पत्रें पाठवायास लागले. त्या युक्ती करून बाबिंग्तनानें कळविलें कीं, आह्मी असा बेत केला आहे, कीं बाहेरून शत्रूनीं चढाव करावा, देशांत बंड करावें, तुला मुक्त करावी, आणि इलिझाबेथ राणीस मारावी. त्याणें तिला कळविलें कीं. माझे जवळ सहा मित्र आहेत, आसे

त्या-

क्याथोलिक धर्माचा आणि आपले प्र-
क्षाचा अभिमान आहे; ते, हें राणीस मारा-
याचें काम करितील. यावर मेरीनें उत्त-
र पाठविलें कीं, तुमचे सर्व बेत मला मान्य
आहेत; तुम्ही राणीस मारायाचें काम जे
गृहस्थ करितील म्हणून लिहिलें, त्याणीं
खचित समजावें कीं, जर माझे हातीं ति-
तकी सत्ता आली, तर त्यांचे उपकारास यो-
ग्य अशीं त्यांस इनामें मिळतील; आण-
खी दुसरी गोष्ट; माझी मोकळीक व्हा-
याचा प्रयत्न, किंवा आंतलेआंत बंड क-
रायाची मसलत करायाचे पूर्वीं, प्रथम
इलिझाबेथ राणीस मारिल्यावांचून
परिणाम नाहीं.

वाल्शिंगम म्हणून इलिझा-
बेथ राणीचा मंत्री होता त्यास या सर्व
गोष्टींची बातमी लागली होती; त्याणें
त्यांची मसलत तयार झाली, आणि ती

ड वाल्यांकडे खचीत गुन्हा लागू होईल, असें झालें ह्मणजे त्यांचें शासन करावें असा निश्चय केला होता. मग बाबिंग्तन आणि त्यांचे सोबती यांस धरायाचा हुकुमनामा लिहिला; तेव्हां ते नाना प्रकारचे वेष घेऊन चोरून राहूं लागले. परंतु लवकरच त्या सर्वांस धरून कैदेंत ठेवून चौकशी करायास नेलें; त्यांचा तपास होऊं लागला तेव्हां एक एका तऱ्हेचें सोंग, दुसरा दुसरे प्रकारचें; असें होऊं लागलें ह्मणून, त्यांतून मुख्य मुख्य होते त्यांस मुळापासून सर्व गोष्टी कशा झाल्या त्या पुसोन घेतल्या. त्यांतून चवदा आसामींचा शिरच्छेद केला, आणि सात असामी आपला अन्याय कबूल होऊन मेले. हे दुष्ट लोक मेल्यावर, पुढें त्यांपेक्षें मोठ्या मनुष्याचा शिरछेद झाला; तो ज्याणीं केला त्यांस दुसरा कशाचा अधि-

कार

कार नव्हता; एक जबरदस्तीचा मात्र.

तें वर्तमान असें. इलिझाबेथ राणीनें चाळीस सभासद आणि त्यांत मुख्य पांच न्यायाधीश, असे नेमून त्यांस काम सांगीतलें कीं, तुम्ही मेरीची चौकशी करून तिला शासन काय करावें तें ठरवा.. त्यांतून छत्तीस आसामी

नवेंबर ११ १५८६ फाथरिंगे क्यास्तिलाजवळ गेले; आणि तिणें चौकशीस हजीर व्हावें म्हणून इलिझाबेथ राणीनें पत्र दिलें होतें तें त्याणीं मेरीस दिलें.

सर्जांट गाडी म्हणून एक पुरुष होता त्याणें तिचेवर मुख्य आरोप ठेविला कीं, बाबिंग्‌तनाचें बंड तिला ठाऊक होतें, तें तिला मान्य झालें, आणि तिणें त्यास संमती दिली. बाबिंग्‌तनानें कबुलात करून दिली होती, आणि त्या दोघांचीं रुगारपत्रें सांपडलीं होतीं, त्यांव-

रून

रून तो आरोप खरा असा पुरावा झाला.

त्या राणीचे अपराध काय असतील ते असोत; परंतु इतकें खरें कीं, तिला शासन बहुत झालें. तिणें प्रार्थना केली कीं माझे चौकशीचे अगोदर जे कागद मी तयार केले होते ते मला द्या, परंतु त्याणीं दिले नाहीं; मग ती ह्मणाली कीं माझे प्रतिज्ञेची नक्कल तरी मला द्या, तीही त्याणीं दिली नाहीं; पुढें तिणें विनंती केली कीं इतके विद्वान् तसेच वक्ते पंडित आहेत, यांशीं माझा पक्ष घेऊन वाद करील असा एक मला वकील तरी करून द्या; परंतु तिचें ह्मणणें कांहींच ऐकिलें नाहीं. पुढें कांहीं थोडे दिवसांचा विलंब करून शेवटीं तिचा शिरच्छेद करावा असें शासन वेस्तमिन्स्तरांत ठरविलें. तेथें त्या मुखत्यारांतून दोन मात्र नव्हते-बाकींचे सर्व होते.

मेरीचा

मेरीचा शिरच्छेद करायाचें, इं-लिझाबेथ राणीचे मनांत नव्हतें; हें ती उगीच बाहेरून मात्र दाखवीत असे. पुढें मागें जर मेरी राजासनावर बसली तर ती आपल्यावर राग काढील, अशी मनांत भीति आणून राणीचे प्रधान अनेक युक्ती करून तिचे हातून तें निर्दय कर्म कसें तरी घडावें, असा उद्योग करीत होते. यामुळें राज्यांमध्यें नेहमी बंडें कावे यांचा बातम्या उठूं लागल्या; तेणें करून राणीचें मन भयग्रस्त झालें. जसा एकादा मोठ्या संकटांत किंवा आपत्तींत पडतो तशी ती दिसे; बहुधा एकांतीं बसे. आणि अस्पष्ट अक्षरें बोले; तीं केव्हां केव्हां ऐकायास येत; त्यांतला भावार्थ हा कीं मला मोठें संकट प्राप्त झालें, आतां पुढें काय करावें? तशा विपत्तींत तिणें एके दिवशीं डेविसन म्हणून सरकेतारी

होता

होता त्यास बोलावून आणिला, आणि सांगीतलें कीं मेरीची मोकळीक व्हायाकरितां लोक कांहीं प्रयत्न करितील; ह्मणून मी शिरछेदपत्र लवकर करणार तर तें तूं तयार कर. त्यावर तिणें सही केली, आणि सांगीतलें कीं, मोहर करायास तें चान्सराजवळ पाठवावें. परंतु दुसरे दिवशीं सकाळीं डेविसनाजवळ दोन वेळ दोन गृहस्थांबरोबर निरोप पाठविला कीं, तुमची माझी भेट व्हायाचे पूर्वीं ते हुकुम मोहर करायास नेऊं नका. त्याणें तिला सांगून पाठविलें कीं, हुकुमावर मोहर झाली. अशी त्याणें त्वरा केली पाहून, राणीस राग आला. डेविसनाचे मनांत होतें कीं कसें तरी करून मेरीस शासन ठरविलें आहे, तें सिद्धीस जावें; ह्मणून त्याणें तें सर्व वर्तमान अमात्यांस विदित केलें; त्याणीं असा विचार ठर-

विला कीं तो हुकुम लागलाच सिद्दीस न्यावा; आणि डेविसनास आश्वासन दिलें कीं, राणीजवळ आह्मी तुझे विषयीं पुरावा करूं. मग तें भयानक आज्ञापत्र, बील ह्मणून पुरुष होता त्याचे स्वाधीन केलें. त्या पत्रावर श्रूस्बेरी, डर्बी, केंत आणि कंबर्लंडाचे अर्लोंचीं नावें लिहिलीं होतीं. त्यांस बीलानें बोलावून आणिले; आणि ते सर्व मिळोन दोन शिरछेत्ते बरोबर घेउन फाथरिंगे किल्यास निघाले.

त्याणीं आतांच मेरीला सांगून पाठविलें कीं उद्यां सकाळीं पांच घटिका दिवसास मृत्यूची तयारी करावी. मग, त्या दिवसाकरितां तिणें रेशीम व मखमालेचा पोशाक राखून ठेविला होता, तो आंगावर धारण केला. त्या प्रांताच्या शेरिफ टामस आंड्रुस ह्मणून होता त्याणें तिला सांगीतलें.

तूलें कीं, वेळ झाली, आतां तुह्मी माझे बरोबर चला. ती बोलिली माझे कडून सिद्धता आहे. असें ह्मणोन तिणें आपलें चाकरांचा निरोप घेतला. मग दोन शिपायांचे खांद्यावर हात देऊन, हातांत हस्तिदंताचा एक शूळ घेतला आहे, अशी स्वस्थ चित्तानें डोक्यावर बारीक कापडाचा पदर घेऊन १० शेरिफाचे मागून जाती झाली.

जे गृहस्थ आले होते ते आणि शेरीफ, हे पुढें चालिले आहेत, आणि तिचे घरचा कारभारी मेल्विल तिची स्वारी चालवितो आहे, अशी ती, जेथें शिरछेद करायाकरितां काष्ठ पुरून त्यावर काळें फडकें घातलें होतें, तेथें आऊन बसली नंतर तोबील राणीचा हुकुम वाचूं लागला.

तेव्हां फीटर्बरो गांवचा डीन, फ्लेचर नावाचा होता तो गराजांचे बाहेर उभा राहून बहुत स्तुतीचा गोष्टी बोलूं लागला.

म्हणून त्यास संताप आला होता, हेंही एक दुसरें कारण. तो पूर्वीं कांहीं दिवस इंग्लंडांत येऊन जबरदस्त हल्ला करायाचे तयारींत होता, त्या करितां त्याचे विशाळ राज्यांत सर्वत्र अरमाराचा डंका पडला, आणि अनेक युक्तीनें प्रजांवर करबसवून तें तयार केलें. त्या अरमारांत युरोप देशांत पूर्वीं कधीं पाहिलीं नव्हतीं अशीं मोठीं १३०० गलबतें होतीं. साटाक्रोसाच्या मार्कुइस होता त्यास त्या अरमाराचा सरदारपणा दिला. त्या गृहस्थानें समुद्रांत लढाई करून बहुत कीर्ति मिळविली होती. जमिनीवरचे फौजेच्या सरदार पार्माचे ड्युकास केला होता. त्यांतली वीस हजार फौज गलबतावर चढविली होती, आणि चवतीस हजार इंग्लंडांत जायास नेदर्लेंडांत तयार होती. तें अरमार जय पावून येईल असा स्पानियार्डांचा निश्चय

निश्चय होता, ह्मणून त्याचें नाव अजिंक अरमार असें ठेविलें होतें.

तें भयानक अरमार निघून इंग्लंडावर येतें आहे, ही बातमी समजून इंग्लंडांतले सर्व लोक पराकाष्ठेचे घाबरे झाले; कारण त्यांशीं लढायास इंग्लिशांजवळ सगळीं गलबतें तीस होतीं; तींही त्यांचे पेक्षें फार लहान. हें समुद्रांतून; आतां जमिनीवरून तर इंग्लिशांचा कांहींच उपाय चालणार नाहीं असें लोकांस भय होतें; कारण शत्रूंचे फौजेंत बंदोबस्त अधिक, आणि त्यांस विपत्तीचीसंवय होती. अशीं स्पानियार्डांचीं गलबतें पुष्कळ, आणि इंग्लिशांचीं थोडीं दिसत मात्र; परंतु इंग्लिशांचे खलाशी लोक कुशळ, आणि शूर ह्मणून त्यांचा जितका बंदोबस्त होता तितका स्पानियार्डांचा नव्हता. एफिंगम शहरांत रहाणारा लार्ड

हवार्ड

हवार्ड ह्मणून पुरुष त्यावेळेस मुख्य नौकाधिकारी होता, त्याणें इंग्लिशांचा अरमाराचा सरदारपणा आपणं पत्करिला.

युरोप देशांत ज्यांची मोठी कीर्ति असे ड्रेक, हाकिन्स, आणि फार्बिशर, इत्यादिक पुरुष त्याचे हाताखालीं चाकरीस होते. इंग्लिशांचीं आणि फ्लेमिशांचीं मिळोन चाळीस गलबतें जमवून त्यांचा सरदारपणा लार्ड सीमोरास देऊन पार्माचे ड्युकाचें निवारण कराया करितां तीं डंकर्क बंदराजवळ पाठविलीं. यारीतीची इंग्लिशानीं सिद्धता केली असतां, युरोप देशचे सर्व प्राटेस्तंट राजे कोणत्या धर्माचा विजय होतो हें पहायास उत्सुक झाले होते.

स्पानिश नौकासमुदाय निघोन यायाचा बेतांत होता, इतक्यांत त्याचा मुख्यं

मुख्य नौकाध्यक्ष सांटाक्रोस आणि उ-
पनौकाध्यक्ष पालिआनो हे दोघेही मर-
ण पावले. म्हणून त्या कामाचा सरदारपणा
मेसिदोनियाचे ड्युकास दिला; जास
समुद्राचे कामांत कांहीं कळत नव्हतें. अ-
सो; तीं गलबतें लिज़्बन बंदरांतून नि-
घालीं, त्याचे दुसरे दिवशीं समुद्रांत मोठें
तुफान झालें; आणि कितिएक लहान-
सान गलबतें बुडालीं. त्यांस परत यावें ला-
गलें. मग त्यांतील कांहीं मोडलें तुटलें हो-
तें तें नीट करून पुनः निघाले; तंव वाटेनें
त्यांस एक कोळ्यानें अशी बातमी सांगीत-
ली कीं, स्पानिश तारवांची फुटाफुट झा-
ली असें ऐकून इंग्लिशांनीं आपलीं गल-
बतें परत प्लिमौथ बंदरास नेलीं, आणि
बहुत करून मायसेंही दूर केलीं. स्पानि-
श नौकाध्यक्षास असा हुकुम होता कीं,
फ्लांडर्स देशास आऊन तेथचे लोक आंत

घ्यावे,

घ्यावें आणि मग इंग्लंडांत जावें; परंतु त्याणें या खोट्या बातमीवर विश्वास ठेवून, तें सोडून दिलें; आणि समोर इंग्लंडास गेला. इकडे इंग्लिशांच्या नौकाध्यक्ष एफिंगम सर्व सिद्धता करून स्पानि-शांची वाट पहात होता, अशांत स्पा-निश गलबतें अर्धचंद्राकृती करून येत आहेत असें त्याचे दृष्टीस पडलें. त्या अ-र्धचंद्राकृतीची एक टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत लांबी सात मैल होती. अ-सें असतांही ड्रेक, हाकिन्स, आणि फा-बिशर यांचे हिमतीवर इंग्लिशांच्या नौकाध्यक्ष जाऊन दुरून स्पानिश गल-बतांवर हल्ला करून, त्यांचे रुंद बाजूच्या नाश करिता झाला, हा मोठा चमत्कार. त्या-स जवळ जाऊन लढायाचा धीर होईना. कारण त्याचीं गलबतें थोडीं, तशाच तोफा व इतर सामानही पुष्कळ नव्ह-

तें

तें इंग्लिश त्या मोठ्या गलबतांवर आऊ-
न पडले त्यामुळें त्यांचाही कांहीं नाश झा-
ला, परंतु शेवटीं स्पानिशांचीं दोन गल-
बतें हैराण करून घेतलीं. मग स्पानिश
परतले; त्यांचे मागें इंग्लिश लागले; आ-
णि इंग्लिशांस बाहेरून येऊन दुसरीं
गलबतें मिळालीं, त्यामुळें त्याणीं पाहिलें
कीं आतां त्यांवर जाऊन पडलें असतां, कां-
हीं चिंता नाहीं; मग स्पानिश लोक क्या-
लेइस शहरांत आऊन रहात होते, इत-
क्यांत इंग्लिश आऊन पडले. त्यांस अ-
धिक घाबरे करायाकरितां, हवार्डानें आ-
पले आठ गलबतांत लवकर पेट घ्याया
जोगें दारू इत्यादि सामानसुमान भरून
शत्रूमध्यें पाठऊन दिलीं. स्पानियार्ड
तें पाहून घाबरले आणि पळून गेले; ति-
तक्यांत इंग्लिशांनी त्यांचीं बारा गलब-
तें पकडून त्यांचा नाश केला.

हें

हें वर्तमान घडलें त्यामुळें स्पेनचे दरबाराचा फार अपमान झाला. पुढें मेडिनाचे ड्यूकानें इंग्लंडाचे कांठावर जाऊन मसलत केली, आणि असा निश्चय केला कीं, सैन्याचें सामान सुमान संपत आलें, गलबतांचा फार नाश झाला, आणि पार्मोचा ड्यूक आपलें सैन्य स्वाधीन करीत नाहीं; या कारणास्तव स्पेनास निघोन जावें; आणि वारा चांगला नाहीं म्हणून आर्कनी बेटाचे वाटेनें जावें. त्या प्रमाणें ते उत्तरेकडेस चालिले, त्यांचा पाठीस फ्लांबरोहेड बंदरा पर्यंत इंग्लिश लागले. तेथें त्या स्पानियार्डांचे गलबतांचा वादळामुळें फार नाश झाला. त्यांतून सत्रा गलबतें, जांवर सगळे मिळोन पांच हजार लोक होते, तीं पश्चिमेकडचे बेटांवर आणि अयर्लंडाचे कांठावर जाऊन पडलीं. त्या सर्व गलबतांतून

तांतून सगळीं पन्नास आणि तीन गलबतें परत स्पेन देशास गेलीं; आणि त्यांचाही फार नाश झाला होता. त्यांतून जे परत तांडेल आणि शिपाई आले, त्याणीं लढाईचा गोष्टी सांगून, दुसरे लोकांचे मनांत त्या कामाविषयीं अतिशय भय उत्पन्न केलें.

पुढें इंग्लिशानीं जाऊन स्पानियार्डीवर हल्ला केला. त्या प्रसंगीं एसेक्साचे अर्लानें मोठा पराक्रम केला. तो गृहस्थ शूर, उदार आणि चतुर होता. तो शौर्यगुणेंकरून लढाईंत उच्चपदास योग्य असा असे; तसाच आपलें वक्तृत्व आणि युक्ति याहीं करून दरबारचें काम चालवाया ओगाही होता. त्या वेळेस जीं नाटकें होत त्यांत तो अर्ल आणि इलिझाबेथ हीं दोघें सोबत्या प्रमाणें एकरूप होऊन वर्तत. तिचें वय सा-

ठ वर्षांचें होतें आणि त्याचें त्याचे अर्धेंही न-
व्हतें, तरी लोक सांगत कीं त्यास कांहीं चिं-
ता नाहीं, आपण लहान असें मानिलें ह्म-
णजे झालें; आणि राणीही तसेंच मानीत
असे. या रीतीनें राणीची त्या अर्लावर जे-
व्हां कृपा होती तेव्हां त्यास दरबारांत मोठी
प्रतिष्ठा मिळायास काय अशक्य? तो सर्व
कामें आपले इच्छेस येईल त्या प्रमाणें करी-
त असे. परंतु तो कसा तरी, तरणा आ-
णि नवा होता त्यामुळें त्यास गर्व झाला,
आणि वाटूं लागलें कीं मला जे लोक बरें
ह्मणतात आणि प्रशंसा करितात हे माझे
गुणामुळें; राणीची कृपा आहे ह्मणून नव्हे.
एके दिवशीं अयर्लंडाचा गवर्नर कोण
नेमावा याविषयीं तो अर्ल आणि बर्ली-
ग ह्मणून एक लार्ड या दोघां मध्यें राणी-
समक्ष वाद पडला; तेव्हां तो अर्ल इतका
संतापला कीं, त्यास देहभान नाहींसे झालें.

त्याणें

त्यानें राणीकडे पाठ केली, तें पाहून तिला फार राग आला, आणि तिनें त्याचे कानावर एक बुकी दिली. मग आपण कोण, करतों काय, राणीचा मान किंवी, या सर्व गोष्टी विसरून त्याणें लागलाच आपला हात तरवारीवर घातला; आणि शपथ केली कीं, असें तुझे बापानें केलें तरी मी सोसणार नाहीं. हें राणीनें मनास आणिलें नाहीं, आणि रागाचे थोडे दिवस गेल्यावर, त्याला पूर्वीचे पदावर पुनः स्थापिला. तशांत त्याचा प्रतिस्पर्धी लार्ड बर्लीग तोही मेला, म्हणून त्याची सत्ता पुनः अप्रतिहत चालूं लागली. तेव्हां अयर्लंडातले लोक केवळ इंग्लिशांचे ताबेखालीं आले नव्हते, म्हणून पुनःपुनः ते शेजारचे सज्ञान लोकांवर हल्ला करून, आपला प्रताप दाखवीत. त्या लोकांस सरकारचे ताबेखालीं आणावे हा उद्योग आपले लोभास अनुकूळ आहे, असें एसे-

क्सास

क्सास वाटलें. त्याचे शत्रु जे होते त्यांसही तें वाईट वाटलें नाहीं, कारण तो तेथें होता तों पर्यंत त्यांस वर येऊं देत नसे, म्हणून कसातरी तो एक वेळ दरबारांतून निघावा, अशी ते इच्छा करीत होते. परंतु त्या उद्योगानें त्याचा पूर्ण नाश केला.

शत्रूंचें मुख्य रहायाचें ठिकाण अल्स्तर तेथें जाऊन त्याणें हल्ला करावा तें नकरितां त्याणें आपलें सैन्य मन्स्तर प्रांतांत नेलें, तेथें उगीच आपलें बळ खर्च केलें: कारण तो जातांच ते लोक शरण आले: आणि तो परत येऊं लागला तेव्हां मात्र पुनः त्याणीं शस्त्र धारण केलें. आणि मग त्यांवर उपाय चालेनासा झाला. जा उद्योगापासून राणीनें फार आशा केली होती, तो या रीतीनें केला असें पाहून, तिला वाईट वाटलें; आणि असें असतांही तो आग्रहानें वारंवार तिला आणि मंत्र्यांला पत्रें

लिही-

लिही, ह्मणून तिला विशेष कोप आला. इ-नकें झालें असतांही आज्ञाविचारितां, आ-णि कोणी नदिली असतां तो स्वतः राणीज-वळ बयाद सांगण्यास परत आला, ह्मणून तिला फारच संताप आला.

इलिझाबेथ राणीस असा त्याचा फार राग आला होता खरा, परंतु तो दृष्टीस पडतांच दया आली; इतका हुकुम मात्र केला कीं, मी आज्ञा करीन तों पर्यंत एसेक्सास त्याचेच घरीं कैदेंत ठेवावा; जर कांहीं महि-ने पर्यंत तो तसाच स्वस्थपणीं असता तर त्यास पूर्वींचीं सर्वपदें प्राप्त झालीं असतीं. परंतु तो आपल्यावर जुलुम केला असें ह्म-णत असे, त्याचा विचार करून राणी त्या-स मुक्त करणार होती; त्याची त्याणें वाट पा-हिली नाहीं, असा त्याचा स्वभाव उतावीळ होता; आणि दुसरें असें झालें कीं, त्याणें पू-र्वीं मख्ता करून घेतला होता, तो असा

कीं, आपले वांचून दुसरे कोणी राज्यांत दा-
रू आणून विकूं नये; तो मक्ता त्याजव-
ळ फार दिवस चालिला होता, तो पुढें चा-
लवावा ह्मणून त्याणें राणीजवळ विनंति
केली, ती तिणें मान्य केली नाहीं, ह्या मुळें
त्याणें अन्याय कर्मे केलीं. फार दिवस लो-
क त्याची प्रशंसा करीत होते, त्यांवर भरं-
वसा ठेवून जे दरबारांत आपले शत्रु आहे-
त, त्यांचें पारिपत्य करावें असा त्याणें नि-
श्चय केला; तें पारिपत्य राणी करणार ना-
हीं असें त्यास वाटलें होतें. लंडन शहरचे
लोकांचा धर्माविषयींचा आणि राज्य का-
रभाराविषयींचा बेत त्याचे मनास आव-
डला होता, ह्मणून त्यांवर त्याचा बहुत
विश्वास होता. जे प्युरिटन* होते, त्यांस

* प्युरिटन असें त्या वेळेस प्रातेस्तंटास ह्मणत असत; कारण त्यांचे धर्म इतरांपेक्षें शुद्ध असत. आलीकडे हा शब्द निंदासूचक झाला आहे.

धर्मसंस्थेचे बंदोबस्ताविषयीं अगत्य दाखवून तो संतुष्ट करीत असे; आणि जे मोठ्या पदावर होते त्यांचीं दुष्कर्में दाखवून दुष्टांचा संतोष करी. याचे आंधळे क्रोधाचा निश्चितार्थ शेवटीं हा ठरला कीं, त्याचा विश्वासू एक सरक्रिस्टाफर ब्लोंट ह्मणोन होता, त्याणें सरकारचे वाड्याचे दरवाजे आपले स्वाधीन करावे; सरजांन डेविसानें दिवाणखाना संभाळावा, आणि एसेक्सानें स्वतः आपले साथी घेऊन राणीजवळ जावें, आणि प्रार्थना करावी कीं, जे तुझे आणि माझे दरबारांत शत्रु आहेत ते काढून टाकून नवें पार्लमेंट करावें, आणिं राज्य पुढें चांगलें चालवावें.

पुढें कोणत्या रीतीनें चालावें, याचा विचार एसेक्स करीत असतां, त्यास एक गुप्त पत्र आलें, त्यांत असें लिहिलें होतें कीं तूं आपले जीवाचें संरक्षण कराया

विषयीं जपून रहा. तो प्रसंग भयंकर अ-सें पाहून, अर्ले आपले मित्रांशीं मसल-त करूं लागला; परंतु त्यांजवळ शस्त्रें ना-हींत, सामानाचा तोटा आणि तशांत, वा-ड्यांतले पहाऱ्यावर पहिल्या पेक्षां दुप्पट मनुष्य आलें; त्या कारणामुळें तेथें हल्ला करायाचा कांहीं उपाय राहिला नाहीं. त्यां-ची मसलत होत असतां, शहरच्ये लोकां-कडून अर्लीस मदतगारीची सिद्धता आ-हे, असा कोणी एका पुरुषानें येऊन नि-रोप सांगीतला. हा पुरुष बातमी समजा-या करितां बहुधा त्याचे शत्रूनींच पाठवि-ला असावा. तशा संकटसमयांत शहर-चे लोकांस उठविणें, हा बेत अतिशय अविचारी खरा; तथापि त्याचा निश्चय के-ला; परंतु तो दुसरे दिवसापर्यंत तसाच तकूब ठेविला.

दुसरे दिवशीं मोठे सकाळीं त्याचे

स्नेही

लेडी रटुंड आणि सोथंपतन एथील अर्ले, लार्ड सांडीस, पार्टीगर आणि मौंटीगल; आणि दुसरे प्रतिष्टित तीनशें गृहस्थ त्याचे कचेरीस जमले. मग कोणी परकी आंत येऊं नये, म्हणून लागलींच वाड्याची दरवाजांस कुलुपें घालून अर्लानें त्या सर्व बंडवाले लोकांस अकस्मात् उठवायाची आपली मसलत कळविली; तितक्यांत सरवाल्टर रालीगानें दुसरे एक सरफर्डिनांडोगार्जिस् या नावाचा बंडवाल्याजवळ निरोप सांगाया करितां कोणी पुरुष पाठविला; त्याचें आणि सरफर्डिनांडोचें टेम्स नदीवर बोलणें झालें. तेव्हां त्या पुरुषास एसेक्साचे सर्व मसलतीची बातमी लागली. मग एसेक्साचे अर्लानें पाहिलें कीं, आतां सगळी मसलत हातांतून आली; म्हणून घरांतून निःघोष अकस्मात् बंड करायाक-

रितां

रितां बाहेर चालिला. त्यास असें वाटलें कीं, लोक आपल्यास बरें ह्मणतात त्यापेक्षें संकट समयीं उपयोगी पडतील; परंतु तसें झालें नाहीं. तो दरबारवाले दोनशें लोक बरोबर घेऊन शहरांत जायास निघाल्यावर, वाटेनें त्यास बेड्फोर्डचा अर्ल आणि लार्ड क्राम्वेल हे येऊन मिळाले. तो रस्त्यानें मोठ्यानें बोलूं लागला कीं, माझा जीव घ्यायाची मसलत आरंभिली आहे." त्यास वाटलें कीं हें ऐकून लोक जमा होतील, परंतु त्यांस मेयरानें हुकुम केला होता कीं, कोणी घरांतून बाहेर येऊं नये. ह्मणून त्यास कोणी एकही पुरुष येऊन मिळाला नाहीं. पुढें त्याचे बरोबर होते तेही चोरून निघोन गेले, शेवटीं थोडेशे लोकांनिशीं तो नदीजवळ आला, आणि एके होडींत बसून एसेक्स वाड्यांत येऊन पोंचला.

मग तो आपले संरक्षणाचा उपाय योजूं लागला. परंतु शौर्येंकरून कांहीं उपाय होऊन त्याचें संकट दूर होईल असें नव्हतें, म्हणून तो ज्यांणीं वेढा घातला होता त्यांसीं बोलणें लावून ओलीस मनुष्यें मागूं लागला; तें ते कांहींच कबूल करीनात; शेवटीं त्याणें प्रार्थना केली कीं, माझे फार हाल करूं नका, आणि सर्व मजकुर नीट समजून घ्या; अशी विनंती करून तो वेढा घालणारांचे स्वाधीन होता झाला.

पुढें एसेक्स आणि सौथंप्तन यांस लांबेथ म्हणून लंडन शहरचा एके प्रदेशीं आर्चबिशप रहात होता तेथें नेले; तेथून दुसरे दिवशीं किल्यावर पाठविले, मग फेब्रुआरी महिन्याचे एकुणिसावे तारिखेस सभासदांनीं त्यांची चौकशी केली. त्याणीं आपसाल काय केला हें ध्यानांत येतें, कारण त्यांचा अन्याय उघड

होता

होना ह्मणून क्षमा व्हायाची शंकाच रा-
हिली नाहीं. एसेक्साचें शासन ठरवि-
ल्यावर त्यास धर्मसंबंधी भय उत्पन्न झा-
लें, जें पूर्वीं त्याचे मनांत नेहमी असे. तें अ-
सें. धर्मपक्षी घेऊन त्याणें त्यास बोध केला,
तेणेंकरून भय पावून तो आपलें सर्व बंड
कबूल झाला. अशी गोष्ट सांगतात कीं,
त्याचे शिरछेदपत्रावर सही करायाचे वेळे-
स राणीनें थोडासा अनमान केला होता.
त्यावरून एसेक्सास आशा होती कीं,
आपणास क्षमा प्राप्त होईल. दुसरें; तिणें
पूर्वीं त्याला एक आंगठी दिली होती, आ-
णि सांगीतलें होतें कीं तुला कसें जरी संक-
ट प्राप्त झालें, तरी ही माझे जवळ पाठवू-
न दिलीस ह्मणजे त्याचें निवारण होईल.
ती आंगठी त्याणें नाटिंगमचे कौंटेसे
बरोबर राणीला द्याया करितां पाठवून दि-
ली. परंतु ती कौंटेस अर्लाचा आंतून

द्वेष

द्वेष करीत होती, म्हणून तिणें ती तशीच मध्येंदाबून ठेविली. इकडे राणीला राग आला कीं; अर्ल इतक्या विपत्तींत पडला असतांही क्षमा मागत नाहीं. वास्तवीक पहातां, ती ज्या अर्लाचें शासन करीत होती, तो जितक्या संकटांत होता, तितकेंच संकट तिलाही होतें. तें असें: तिणें एक वेळ शिरछेद पत्रावर सही केली, पुढें तें फिरविलें; पुनः त्याचा वध करायाचा निश्चय केला, आणि पुनः तिला दया आली. शेवटीं तिणें त्याचा शिरछेदाविषयीं संमति दिली; तेव्हांपासून तिला एकही सुखाचा दिवस आला नाहीं.

या रीतीनें राणीचा स्नेही मरण पावतांच तिचीं सर्वसुखें लयास गेलीं, असें दिसून आलें. मग अभ्यास पडला होता म्हणून मात्र ती राज्य कारभार चालवी; परंतु कोण त्या गोष्टींत सुख राहिलें

लें नाहीं. तिला जें दुःख झालें, तेणें करून तिचा शरीरीं अशक्तता येत चालिली; आणि तिचा अंतकाळ जवळ आला असें स्पष्ट दिसूं लागलें. पुढें लवकरच तिची वाचा बंद झाली, आणि कांहीं घटिकापर्यंत किंचित् निद्रा येऊन ती एकवेळही न ओरडतां मरण पावली. त्या वेळेस तिचे वयास सत्तरावें वर्ष होतें, आणि तिणें पंचेताळीस वर्षें राज्य केलें. प्रसंगानुरूप इलिझाबेथ राणीचे स्वभावांत अंतर पडलें. तें असें. ती राज्य करूं लागली तेव्हां तिचा स्वभाव नम्र आणि यथायोग्य होता; परंतु शेवटीं आग्रही आणि क्रूर असा झाला. तिचे मध्यें फार चातुर्य होतें: परंतु आपल्या शरीरांत सौंदर्य नाहीं हें तिला कळत नसे; आणि पांसष्ट वर्षांची होती, त्या वेळेसही कोणी तिचे सुंदरपणाची प्रशंसा केली तर ती त्यावरें प्रसन्न

होई

होई.

इलिझाबेथ राणीमध्यें काय दोष होते असतील ते असोत; परंतु इंग्लिशानीं सर्वदा तिचें स्मरण करून स्तुतीच करावी. तिणें पार्लमेंटांत आपला मोठा अंमल चालविला होता, ह्मणून पार्लमेंटाचे सभेंत असें ह्मणत कीं, राज्यनियमाचे बाहेर राणी चालते; तिचा मर्जीस वाटेल त्या प्रमाणें नियम करायास ती समर्थ आहे; अशी मोठी सत्ता ती इच्छित असे खरी, परंतु ती कोठें भलते ठिकाणीं करीत नसे. हेंही खरें कीं, तिचा राज्यांत दुसरें कोठचें मोठें राज्य साध्य झालें नाहीं; परंतु दिवसानुदिवस व्यापाराची वृद्धि होत चालिली, आणि लोकांस कळूं लागलें कीं, पुढें वास्तवीक युद्ध आणि विजय यांचें स्थळ समुद्रपृष्ठ होणार. त्या काळंपर्यंत जर देशावर जो पाहिजे तो ह-

ला

ल्ला करून लुटीत असे, तो देश सांवरून जे पूर्वी हल्ला करीत होते, त्यांसच भयानक होत चालिला. **पोर्टुगीस** आणि **स्पानियर्ड** लोक समुद्रांतून दूरदेशास जाऊन बहुत द्रव्य मिळवूं लागले, तें पाहून **इंग्लिशांसही** ईर्षा आली, आणि तेहिं दुस्थानास आवयास जवळची वाट शोधून काढाया करितां नाना प्रकारचे उपाय करिते झाले. **सरवालटर रालिग** म्हणून जो प्रसिद्ध गृहस्थ पूर्वी सांगीतला, त्याणें सरकारचा मदतगारी वांचून **अमेरिका** देशाचा **न्युइंग्लंड** म्हणून एक प्रांत आहे तेथें वस्ती केली. तसाच आंतले आंत व्यापारही बहुत चालिला होता. दुसरें असें झालें कीं कित्येक डच लोक आपले देशांत उपद्रव झाल्यामुळें **इंग्लंडांत** येऊन राहिले, त्यां बरोबर कळा कौशल्यें बहुत आलीं. त्या वेळेस असें झालें

कीं

कीं, सर्व बेट एकदांच अज्ञान निद्रेंतूनजा-
गें झालें काय ! उत्तरोत्तर कळा कौशल्यें,
व्यापार, आणि राज्यनीति दृढ होत चा-
लिली. इलिझाबेथ राणीचे राज्यांत
प्रथम विद्या वृद्धिंगत होऊं लागल्या.
सरवाल्टर रालिग आणि हूकर
ह्मणून दोन विद्वान् होते, त्याणीं भाषा
सुरूपतेस आणाया विषयीं उद्योग के-
ला; स्पेन्सर आणि शेक्स्पीयर या
नावाचे दोन कवि होऊन गेले, त्यांस तर ए-
थें स्तुति केल्यानेंच केवळ विशेष शोभा ये-
ईल असें नाहीं. हे सर्व असोत; परंतु
या राणीचे राज्यांत लार्ड विरुलमाचे
पदाचा अधिकारी फ्रान्सिस बेकन
ह्मणून जो वस्तुविवेचक होऊन गेला, त्या-
ची किती स्तुति केली तरी थोडीच; त्या-
ची लिहिण्याची पद्धति सरळ, आणि
शुद्ध; त्याचें चातुर्य, विद्या, आणि सूक्ष्म-

दृष्टि, यांहीं करून मात्र पराजित झालें होतें. जर सर्व इतिहास पाहून राज्यें कशीं कशीं वृद्धि पावलीं आहेत हें पाहिलें, तर जसे इंग्लिश लोक या राणीचे राज्यांत थोडके काळांत चतुर, पराक्रमी, आणि सुखी झाले, असें दुसरें एकही उदाहरण सांपडणार नाहीं. हें खरें कीं, या राणीचे राज्यांत स्वतंत्रता स्थिर झाली नाहीं, आणि राणीनें आपली सत्ता अतिशय वाढवून स्वेच्छेनें व्यवहार केला; परंतु जेव्हां व्यापाराची लोकांत प्रवृत्ति झाली, तेव्हां सहज स्वतंत्रता झालीच; कारण, ज्या लोकांत चांगला व्यापार चालिला आहे, ते राजाचे सेवकभावांत फार दिवस वागले ही गोष्ट कधीं झाली नाहीं.

प्रथम भाग समाप्तः

# या पुस्तकांतील अप्रसिद्ध शब्दांचे अर्थ.



## अ

| | पृष्ठ |
|---|---|
| अयर्लंड, इंग्रेजी | १ |
| अर्ल, इं० | ३६ |
| अतिभक्ति, स्त्रीलिंग | १२३ |
| अविच्छिन्न, वि० जास नाश नाहीं तो. | ३ |

अभिषेक, पु० स्नान.

अभिरुचि, स्त्री० इछा, आवड.

अल्पतृष्ण, वि० जास इछा थोडी असते

अमानुष, वि० मनुष्याचे शक्तिपेक्षें अधिक.

अभेद्य, वि० ज्याचा भेद होत नाहीं.

अनुत्सुक, वि० जास हौस नाहीं.

अव्यवस्थित, वि० जास बंदोबस्त नाहीं.

अनुरक्त, वि० प्रीतियुक्त.

अग्रगण्य

## अ

अग्रगण्य, वि० मुख्य.

अप्रौढ, वि० हलका.

अनिंद्रियनिग्रह, पु० इंद्रियें स्वाधीन नसणें.

अग्रेसर, वि० मुख्य.

अत्यद्भुत, वि० फार चमत्कारीक.

अनुपकारिता, स्त्री० कृतघ्नपणा. उपकार नजाणणें.

अपहारकता, स्त्री० लबाडीनें घ्यावें असा स्वभाव.

अविनय, पु० दांडगाई.

अपभ्रंश, पु० अशुद्ध शब्द.

अभद्र, न० अशुभ.

---

## आ

पृष्ठ

आर्चबिशाप, इं० . . . . . . . . ४६

आस्वेड निस्डे, इं० . . . . . . . ७०

आफीस.

## आ.


आदिकारणभूत, वि० मुख्य कारण.
आस्थावान्, पु० जास अगत्य असतें तो.
आक्षेप, पु० विघ्न, अडथळा.

---

## इ.


इतिहास, पु० बखर, वास्तवीक घडलेलीं वर्तमानें.

---

## ई.

## उ

उद्युक्त, वि॰ कामास लागलेला.

उपशम, पु॰ शांति, नाहींसें होणें.

उपस्त्री, स्त्री॰ बटिक. जिशीं लग्न झालेलें नाहीं अशी बायको.

उत्सुक, वि॰ आस हौस असलेला.

उपक्रम, पु॰ प्रारंभ.

उपजीविका, स्त्री॰ वांचणें. वांचण्याचें साधन.

उत्तेजित, वि॰ उत्साह युक्त.

उपदिष्ट, वि॰ सांगीतलेला, शिकविलेला.

---

## ऊ

ऊर्णावस्त्र, न॰ लोंकरीचें कापड.

---

## ऐ

## औ

औरस, पु॰ आपणापासून झालेला, पुत्र इ॰.

औद्धत्य, न॰ दांडगेपणा.

## क

ता ईश्वरानें १८३२ वर्षांपूर्वी पृथ्वीवर आपला पुत्र पाठविला होता; व जाणें क्रिस्तियन धर्म लोकांस सांगीतला तो.

कुनीति, स्त्री॰ अन्याय, वाईट मार्गानें चालणें.

क्रोधाग्नि, पु॰ (क्रोध अग्नि) अतिशय राग.

क्रोधसंतप्त, वि॰ फार रागें भरलेला.

क्रौन, इं॰ क्रौन म्हणून एक नाणें पूर्वी चालत असे. त्याची किंमत पांच शिलिंग म्हणजे सुमारें अडीज रुपये.

कुत्सित, वि॰ घाणेरा, वाईट.

कामुक वि॰ सकाम.

कृतघ्न, वि॰ जो उपकार जाणत नाहीं तो.

कौंटेस, इं॰ कौंट शब्दाचें स्त्रीलिंगी रूप.

---

## ग



## च



## ज

ट



ड



त

तन्निमित्त, अ० त्यामुळें.

द


देहांतरप्राप्ति, स्त्री० मेल्यानंतर जीवास दुसरा देह होतो.
दासदासी, स्त्री० चाकर व बटकी.

## द

दुष्कर्म, न॰ पाप, वाईट काम.

दौरात्म्य, न॰ दुष्टपणा.

दुरात्मता, स्त्री॰ दुष्टपणा.

देवत्रित्व, न॰ तीन देव ईश्वर, १. त्याचापुत्र इशुख्रिस्त, २. पवित्र आत्मा, ३.

---

## ध

धर्मस्थापक, पु॰ धर्मस्थापणारे.

धर्मपक्षपाती, पु॰ धर्माविषयींचा कांहीं तरी अधिकार जाकडे असतो तो.

धर्मोपदेशक, पु॰ लोकांस धर्म सांगण्याचा अधिकार जास असतो तो.

धर्माध्यक्ष, पु॰ धर्मपक्षपात्यामध्यें आर्चबिशपाचे खालचे पायरीवर जो असतो तो. बिशप.

धर्मबाह्य, वि॰ जाचा धर्म सुटला.

धर्मयुद्ध, न॰ क्रुसेड पहा पृष्ट ८२.

न


निमग्न, वि. बुडला. आसक्त.
निर्धन, वि. जाचे जवळ पैका नाहीं तो द-रिद्री.
निस्वाद, वि. जास गोडी नाहीं.
नूतन, वि. नवा.
नियम, पु. बंदोबस्त. कायदा.

प

# प



प्रवृत्त, वि. काम करायास जाणें आरंभ केला तो.

प्रतीकार, पु. उलट उपाय.

प्रसृत, वि. पसरलेला. विस्तीर्ण.

पद्य, न. श्लोक.

प्रतिबंध, पु. अडथळा.

पंचमहाभूतादिवस्तु, न. (पंचमहाभूत आदिवस्तु.) सर्व पदार्थ.

प्रताप, पु. पराक्रम. शूरपणा.

पदच्युत, वि. ज्याचा अधिकार गेला तो.

परमस्तुत्य, वि. फार स्तुती करायास योग्य.

प

पुण्यक्षेत्र, न॰ पुण्याची जागा.

परतंत्रपणा, पु॰ दुसऱ्याचे स्वाधीन असणें.

प्रतिपक्षी, पु॰ शत्रु, द्वेष्टा.

प्रज्वलित, वि॰ पेटलेला.

प्रार्थनीय, वि॰ विनंती करायास योग्य.

प्रसार, पु॰ पसरणें. विस्तार.

पराजित, वि॰ जिंकलेला.

पौंड. इं॰ एक नाणें आहे त्याची किंमत सुमारें रुपये दहा.

---

फ



---

ब

ब


बहिष्कृत, वि० बाहेर काढलेला.
बंडेयपणा, पु० बंड करावें असा स्वभाव.
बरकस, स्त्री० वैमनस्य. तंटा.

भ

भयप्रदर्शन, न० भय दाखविणें.
भूषित, वि० सुशोभित.
भर्त्सना, स्त्री० निंदा. तिरस्कार.

## म



मतानुसारी, वि. मता प्रमाणें चालणारा.

महत्कर्मारंभ, पु. मोठें कर्म करायास लागणें.

मांडलिक, वि. ज्याचें राज्य लहान असतें तो. (राजा इ०)

महाद्वीप, न. ब्रिटेन बेट सोडून युरोप खंडांत जे देश आहेत त्यां सर्वांचें मिळोन नाव महाद्वीप. याचा अर्थ भूगोल संवादांत पहा पृष्ठ २२

## म

मार्दव, न॰ नम्रपणा. मृदुपणा. ५

## य

पृष्ठ

युनिवर्सिटि. इं॰ .......... ४१

यावज्जीव, अ॰ जंव पर्यंत जीव आहे तं-व पर्यंत.

## र

रोमन, इं॰ १

रमणीय, वि॰ मनास आनंद करणारें.

राजत्व, न॰ राजाचा धर्म. राजेपणा.

राजकारक, वि॰ राजा होण्यास जो यत्न करितो. तो.

रौद्ररस, पु॰ क्रोधावेशानें विचार सुटून हाणणें, मारणें इत्यादि कर्मांविषयीं प्रवृत्ति होण्यास प्रयोजक जो मनोविकार तो.

रक्तमत, न॰ जा धर्माचे रीती पासून फार लोकांचे

## र



## ल



## व

व

नियम करितो तो.

विस्मित, वि० आश्चर्ययुक्त.

वैमनस्य, न० वांकडें. बरकस.

वंशीय, वि० वडिलांपासून चालत आलेलें.

वार्धक्य, न० म्हातारपणा.

विषयोपभोग, पु० संसारांतील भोग भोगणें.

विषयसुख, न० विषयांपासून जें सुख होतें तें.

व्यग्र, वि० चिंतायुक्त.

---

श



---

स

# स


सेनाधिपति, पु. मुख्य सरदार.
संतप्त, वि. तापलेला. रागें भरलेला.
स्वास्थ्य, न. स्वस्थपणा.
स्वतंत्र, वि. स्वाधीन.
संप्रदाय, पु. पद्धति. रीति. चाल.
स्वेछा, स्त्री. आपली इछा.

# स

सतत, अ० नेहमी.

स्वल्पायास, पु० थोडका श्रम.

सामान्यस्वरूप, न० मूळ पहिला भाग.

सदाचरणी, वि० चांगलें ज्याचें आचरण तो.

स्मरणीय, वि० आठवण रहाया जोगें.

स्थिरप्रतिज्ञता, स्त्री० आपली प्रतिज्ञा मोडूं नये असा स्वभाव.

सशास्त्रता, स्त्री० शास्त्राची मान्यता.

सत्यवक्तृत्व, वि० खरें बोलण्याचा स्वभाव.

स्वेच्छाचारित्व, न० मनास येईल तसें वागणें.

सुवृत्त, न० चांगले रीतीचें आचरण.

स्थैर्य, न० स्थिरपणा.

साहसी, वि० उतावळीनें. अविचारानें. किं० निर्भयपणानें मोठे कामास हात घालणारा.

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| [illegible] | ५ | गले | गेले |
| २० | १८ | हात | होत |
| २१ | १२ | त्याचें | त्यांचें |
| २२ | ६ | आईचें | आइचें |
| ६५ | १ | कांकर | कांकरर रिपेची |
| ७६ | २ | मुलांचा | मुलाचा |
| ८५ | १३ | वृद्धि | वृद्धि |
| ९२ | ११ | ग्लामर्ग | ग्लामर्गन |
| ९४ | ३ | लोकापासून | लोकांपासून |
| १७५ | १७ | थोडे | थोडें |
| १९६ | १ | जसे | नसे |
| २२१ | ११ | इहा | [illegible]दा |
| २३१ | १० | चांगलें | चांगले |
| २३१ | ११ | व्हावायाचा | व्हावयाचा |
| २३२ | १० | अशीं | अशी |
| २३२ | ११ | घडलीं | घडली |
| २३[illegible] | १० | गेले | गेलें |

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २४५ | १ | ओतहोत्या | ओतहो[illegible] |
| २४६ | ३ | सैम्याचे | सैन्याचे |
| २५५ | २ | असें | असे |
| २७० | १ | ठरविली | ठरविला |
| २७१ | ८ | त्यांस | त्यास |
| २७२ | १२ | जेथें | तेंथें |
| २८३ | ११ | शिपावांचे | शिपायांचे |
| २९७ | १२ | ससाणें | ससाणे |
| ३०३ | १६ | त्याचींही | त्याचीही |
| ३०४ | १९ | जेन्स | जेम्स |
| ३०५ | १३ | सं[illegible]था[illegible]चे | संस्थानांचे |
| ३०६ | १ | आरण्यांचा | अरण्यां[illegible] |
| ३११ | ८ | आवलडा | आवडलां |
| ३१२ | १३ | वळकर | बळकट |
| ३१६ | १७ | बायवाचलर | बायबाचलर |
| ३१७ | १७ | शिकविलीं | शिकविलें |
| ३१८ | ३ | [illegible]र्लंड | स्वित्झर्लंड |

## शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| [illegible] | १६ | कारभांर | कारभार |
| ३४० | १० | अठावीस | अठ्ठावीस |
| ३४२ | ८ | बोले | बोलेल |
| ३४८ | १२ | साहेव | साहेब |
| ३५४ | ११ | राजाची | राजा |
| ३५५ | ६ | आसे | असे |
| ३६० | १ | सदाचरणीं | सदाचरणी |
| ३६४ | १८ | नार्फीकावर | नार्फोकावर |
| ३६५ | १ | कलें | केलें |
| ३७१ | १५ | संस्थाने | संस्थानें |
| ३[illegible] | १५ | पाठवळ | पाठबळ |
| ३८४ | ११ | धान्यावर | धन्यावर |
| ३९७ | ५ | हृदंयावर | हृदयावर |
| ४१३ | १८ | त्यास | त्यांस |
| ४२४ | ९ | साटा | सांटा |
| ४४५ | २ | इलिझांबेथ | इलिझाबेथ |
| ४६७ | १५ | शोभो | शोभा |